गौण खनिजाच्या खनिपट्ट्यासाठी
लिलावाची कार्यपध्दती.....

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन शुध्दिपत्रक क्रमांकः गौखनि-१०/१११८/प्र.क्र.४४८/ख-२**
हुतात्मा राजगुरु चौक, मादाम कामा मार्ग,
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : ०२ जून, २०२३

**संदर्भ:-**

१) महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३
२) महसूल व वन विभाग, शासन निर्णय क्र.गौखनि-१०/१११८/प्र.क्र.४४८/ख, दि.२३.०१.२०१९.

**प्रस्तावना:-**

महाराष्ट्र गौण खनिज उत्खनन (विकास व विनियमन) नियम, २०१३ मधील नियम ९ मध्ये, शासनाकडे किंवा कोणत्याही सार्वजनिक प्राधिकरणाकडे निहित असलेल्या कोणत्याही जमीनीवरील खाणपट्टे जाहीर लिलावाद्वारे मंजूर करण्याची तरतूद करण्यात आली आहे. त्यानुसार अशा खाणपट्ट्यासाठी संदर्भाधीन क्र.२ च्या शासन निर्णयान्वये लिलावाची कार्यपध्दती निश्चित करण्यात आली आहे.

तथापि, क्षेत्रिय स्तरावर वाळू वगळून इतर गौण खनिजाच्या लिलावाची प्रक्रिया राबवित असताना लिलावधारकास प्रतिब्रास बोलीनुसार होणाऱ्या किंमतीने भूविज्ञानकीय तांत्रिक अहवालात नमूद असलेल्या अंदाजीत उत्खननाच्या परिमाणाच्या १५ टक्के एवढी आगावू स्वामित्वधनाची रक्कम ही साधारणत कोटी रुपये मध्ये असते त्यामुळे दगड या गौण खनिजाचे खाणपट्ट्याच्या लिलावास प्रतिसाद मिळत नसल्याची बाब शासनाच्या निदर्शनास आली आहे.

त्याअनुषंगाने वाळू वगळून इतर गौण खनिजाच्या लिलावाच्या कार्यपध्दतीबाबत संदर्भाधीन क्रमांक २ दिनांक २३.०१.२०१९ च्या शासन निर्णयामधील इ-(१२) मधील तरतूदीबाबत सुधारीत स्पष्टीकरण देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन शुध्दीपत्रक:-**

संदर्भाधीन क्रमांक०२ च्या शासन निर्णयान्वये गौण खनिजाच्या खनिपट्ट्याच्या लिलावाची कार्यपध्दती विहित करण्यात आली आहे. सदर शासन निर्णयामधील मुद्दा क्रमांक इ (१२) मध्ये सुधारणा करण्यात येत असून आता सुधारीत मुद्दा क्रमांक इ (१२) खालीलप्रमाणे वाचावा:-

"ज्या लिलावधारकाचा सर्वोच्च बोलीचा देकार स्विकारण्यात आला आहे अशा लिलावधारकाला त्याच्या प्रतिब्रास/प्रति मेट्रीक टन बोलीनुसार होणाऱ्या किंमतीने भुविज्ञानकीय तांत्रिक अहवालात नमूद केलेल्या अंदाजीत उत्खननाच्या परिमाणापैकी

प्रतिवर्षी अंदाजीत उत्खनन होणाऱ्या परिमाणाच्या १५ टक्के एवढी रक्कम आगाऊ स्वामित्वधन म्हणून वर्षाच्या सुरवातीला सात दिवसात (म्हणजेच ७ जानेवारीपूर्वी) प्रतिवर्षी शासन जमा करणे बंधनकारक राहील. लिलावापूर्वी शासनजमा केलेली इसारा रक्कम अशा आगाउ स्वामित्वधनापोटी प्रथमवर्षाच्या भरावयाच्या रकमेत समायोजीत करण्यात यावी".

सदर शासन शुध्दीपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२३०६०२१५४५२१८८१९ असा आहे. हे शुध्दीपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

SADANAND GOVIND MOHITE

Digitally signed by SADANAND GOVIND MOHITE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=REVENUE AND FOREST DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=9bd008875b6a3a9fddad3e55fe0328df13a27221cb2bbc67abd0155f914efc01, pseudonym=F963BC6AD59D767D7C33C1B8350D778425D54B0E, serialNumber=6590E2301450C474B246074049174C79201BCAD9E5EB15E8F21C282EAEFEDA38, cn=SADANAND GOVIND MOHITE
Date: 2023.06.02 15:46:11 +05'30'

**( सदानंद गो. मोहिते )**
**शासनाचे कार्यासन अधिकारी**

**प्रत,**

१. मा.राज्यपाल यांचे प्रधान सचिव, राजभवन, मलबार हिल,मुंबई.
२. मा.मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, मंत्रालय,मुंबई.
३. मा. विधानसभा अध्यक्ष यांचे खासगी सचिव, विधानमंडळ, मुंबई
४. मा. विधानपरिषद सभापती यांचे खासगी सचिव, विधानमंडळ, मुंबई
५. मा.मंत्री (महसूल) यांचे खासगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. सर्व मा. मंत्री/मा. राज्यपाल यांचे खासगी सचिव, मंत्रालय मुंबई.
७. सर्व मा. विधानसभा/विधानपरिषद सदस्य
८. सर्व मंत्रालयीन विभाग
९. सर्व विभागीय आयुक्त
१०. सर्व जिल्हाधिकारी
११. सर्व उपविभागीय अधिकारी
१२. सर्व तहसिलदार
१३. संचालक, भूविज्ञान व खनिकर्म संचालनालय, नागपूर
१४. निवडनस्ती "ख-२" कार्यासन, महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई.